फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायी/कायम चित्रपट गृहात स्थांतर करताना नाहरकत प्रमाणपत्र घेणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग [विशेष]
परिपत्रक क्र. बासाआर ४५९७/५६/विशा-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दि. २१ जून १९९७.

शासन परिपत्रक

फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतर करताना महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम १९६६ मधील तरतुदीमध्ये विहीत केलेल्या प्रकरण २ ते ७ मधील सर्व बाबींची पुर्तता केल्यानंतर संबंधिताना फिरत्या चित्रपट गृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतर करण्यास परवानगी दिली जाते. अशी परवानगी देताना फार मोठ्या अडचणी येतात. अशा निवेदने शासनाकडे आली होती. त्या निवेदनामध्ये ज्या अडचणी नमूद करण्यात आल्या आहेत त्यामध्ये असे नमूद करण्यात आले आहे की, फिरती चित्रपटगृहे एकाच जागेवर ५ ते १० वर्षे कार्यरत असतात व त्यांच्या परवान्याचे नुतनीकरण दरवर्षी केले जाते. अशा स्वरूपाची १६० फिरती चित्रपटगृहे राज्यात कार्यरत आहेत. अशा फिरत्या चित्रपट गृहांच्या परवान्याचे नुतनीकरण केले जात असले तरी, ज्यावेळी अशा चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतर करण्यासाठी प्रस्ताव सादर केले जातात त्यावेळी महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम १९६६ मधील प्रकरण २ नुसार नाहरकत प्रमाणपत्र घेण्याचा सक्ती केली जाते. प्रकरण २ मधील तरतुदीनुसार संबंधित जागेवर सूचना फलक लावणे, जनतेच्या हरकती व तक्रारी मागविणे तसेच चित्रपटगृहाच्या प्रस्तावित जागेपासून विहीत अंतरात शाळा, रुग्णालये, मंदिरे व अन्य तत्सम भाग आहेत किंवा कसे याची छाननी केली जाते. अशी छाननी करत असताना फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपट गृहात स्थांतर करताना हेतुत: आक्षेप घेतले जातात. उक्त आक्षेपामुळे " नाहरकत प्रमाणपत्र " मिळू शकत नाही व पर्यायाने फिरते चित्रपटगृह निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतरीत होवू शकत नाही. त्यामुळे याबाबत मार्ग काढण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता त्यानुसार फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतरीत करण्याचा प्रस्ताव अनुज्ञप्ती अधिकाऱ्याकडे आल्यावर त्यांना एखादे फिरते चित्रपटगृह एकाच ठिकाणी प्रदीर्घ कालावधीसाठी म्हणजे शासनाने विहीत केलेल्या १० वर्षे कालावधीसाठी

२..

त्याठिकाणी कार्यरत रहात असेल व असा चित्रपटगृहाच्या परवान्याचे वेळोवेळी नुतनीकरण करुन दिले जात असेल तर व सदर फिरत्या चित्रपटगृहाला प्रथम परवाना देताना उक्त नाहरकत प्रमाणपत्रातील अटी तपासण्यात येत असल्यामुळे पुन्हा नव्याने केवळ निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतरित करावयाचे आहे म्हणून ना हरकत प्रमाणपत्राच्या अटींची तपासणी करण्याची आवश्यकता नाही. तथापि प्रत्येक प्रकरणाची छाननी करुन त्याप्रमाणे गुणावगुणावर परवाना प्राधिकाऱ्याने निर्णय घ्यावा.

२. फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपट गृहात स्थांतर करताना बांधकामाचे स्वरुप व स्थायी चित्रपटगृहाचे बांधकामाचे स्वरुप यामध्ये मूलभूत फरक असल्यामुळे महाराष्ट्र चित्रपटगृहे [ विनियमन] नियम १९६६ मधील चित्रपटगृहाच्या बांधकामाबाबतच्या अटी देखील फिरत्या चित्रपट गृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृह स्थांतर होताना त्याच स्वरुपात रहावेयात किंवा कसे याबाबतही अडचणी शासनाकडे मांडण्यात आल्या होत्या. सदर अडचणीच्या अनुषंगाने महाराष्ट्र चित्रपटगृहे [ विनियमन] नियम १९६६ मधील नियम २[फ-२] मधील "निम्न स्थायीवत" चित्रपट गृहाच्या व्याख्येकडे लक्ष वेधण्यात येत आहे. त्यानुसार" निम्न स्थायीवत चित्रपटगृह" म्हणजे, जेथे चलचित्रांच्या सहाय्याने चित्रपट दाखविला जातो असे, पोलादी कोन, लोखंडी कैच्या किंवा इतर अग्निरोधक सामग्री यांचे कोणतेही बांधकाम.

उक्त व्याख्येची तरतुद जर लक्षात घेतली तर फिरत्या चित्रपटगृहाचे निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतर करताना त्याचे बांधकाम कसे असावे हे स्पष्ट होत आहे, तरी हे लक्षात घेऊन निम्न स्थायी चित्रपटगृहात स्थांतर करण्याचे प्रस्ताव परवाना प्राधिकाऱ्याने तपासावे. असेही सूचना शासन देत आहे.

३. फिरते सिनेमागृह ५/६ वर्षांपासून नियमितपणे शेडमध्ये चालू आहे त्यांच्याकडून बांधकाम विभागाचे प्रमाणपत्र व विद्युत विभागाचे प्रमाणपत्र घेऊन त्यांना निम्न स्थायीवत चित्रपटगृहात स्थांतर करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ अ. ना. भोसले ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग [ विशेष]महाराष्ट्र शासन

सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी.